**शासकीय व इतर कार्यालयांमध्ये वाहनांच्या वापरासंबंधीचे धोरण.**

# महाराष्ट्र शासन
## वित्त विभाग
## शासन निर्णय क्रमांकः वाहन २०१४/प्र.क्र.३६/१४/विनियम

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: २२ ऑगस्ट, २०१४.

**वाचा-**

**१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः वाहन-१००० /प्र.क्र.६५/२००१/विनियम, दि.१०.०९.२००१**
**२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः वाहन-२०१० /प्र.क्र.५०/१०/विनियम, दि.१०.०१.२०११**
**३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः वाहन-२०१० /प्र.क्र.५०/१०/विनियम, दि.१४.०६.२०१२**

**प्रस्तावना-**

संदर्भाधीन अ.क्र.१ च्या शासन निर्णयान्वये शासकीय व इतर कार्यालयांमध्ये वाहनांच्या वापरासंबंधीचे धोरण निश्चित करण्यात आले आहे. सदर शासन निर्णयातील तरतूदीनुसार व त्या सोबतच्या “जोडपत्र-अ” मध्ये सर्व प्रशासकीय विभाग (खुद्द) व त्यांच्या अखत्यारितील विभागीय/दुय्यम कार्यालयांतील वाहनांचा आढावा घेऊन निर्लेखित वाहनांऐवजी नवीन वाहने खरेदी करण्याबाबतचा प्रस्ताव "राज्यस्तरीय वाहन आढावा समिती" च्या मान्यतेसाठी सादर करणे आवश्यक आहे. तथापि, बहुतांशी विभागांनी एकत्रित वाहन आढावा घेण्याची कार्यवाही अदयाप पूर्ण केलेली नाही. त्यामुळे अधिकाऱ्यांची शासकीय वाहनाअभावी गैरसोय होऊ नये या दृष्टीकोनातून शासनाने संदर्भाधीन अ.क्र.२ व अ.क्र.३ अन्वये सदर शासन निर्णयाच्या दिनांकापासून ६ महिन्यांकरीता राज्यस्तरीय वाहन आढावा समितीच्या मान्यतेशिवाय, प्रशासकीय विभागांना त्यांच्या अधपित्याखालील निर्लेखित वाहनांच्या एकूण संख्येच्या ७० टक्के मर्यादेपर्यत नवीन वाहने खरेदी करण्यास प्रायोगिक तत्वावर परवानगी देण्यात आली होती. तसेच, सदर कालावधीत वाहन आढावा पूर्ण करण्याची दखल संबंधित प्रशासकीय विभागांनी घेण्याबाबत निदेश दिले होते. संदर्भाधीन अ.क्र.३ च्या शासन निर्णयातील ६ महिन्यांच्या मुदतीचा कालावधी दि.१४.१२.२०१२ रोजी संपला असला तरी अद्यापही बहुसंख्य विभागांनी त्यांचा व त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयांतील वाहनांचा एकत्रित आढावा समितीच्या मान्यतेस्तव सादर केलेला नाही. तरी, शासकीय अधिकाऱ्यांच्या वापरातील निर्लेखित वाहनाऐवजी नवीन वाहनांच्या खरेदीबाबतची प्रक्रीया सुलभ होण्याच्या दृष्टीकोनातून शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

## शासन निर्णय

शासकीय वाहन खरेदीच्या अनुषंगाने पुन्हा खालीलप्रमाणे मार्गदर्शक तत्वे विहित करण्यात येत असून प्रशासकीय विभागांनी त्यानुसार कार्यवाही करावी.

१. सर्व प्रशासकीय विभागांनी (खुद्द) व त्यांच्या अधिपत्याखालील क्षेत्रीय कार्यालयांतील अधिकाऱ्यांच्या वापरात असलेल्या वाहनांचा तसेच सदर कार्यालयांवर सोपविलेल्या विविध कार्यालयांकरीता लागणारी ट्रक, ट्रेलर, ॲम्ब्युलन्स, स्टेशन वॅगन, बस इत्यादी वाहनांची अनुज्ञेयता ठरवून वित्त विभागाच्या

दि.१०.९.२००१ च्या शासन निर्णयानुसार वाहन आढावा राज्यस्तरीय वाहन आढावा समितीच्या मान्यतेने या शासन निर्णयाच्या दिनांकापासून ६ महिन्यात पूर्ण करावा.

**२. प्रशासकीय विभागांना सदर शासन निर्णयाच्या दिनांकापासून दि.३१ मार्च, २०१५ पर्यंत राज्यस्तरीय वाहन आढावा समितीच्या मान्यतेशिवाय, त्यांच्या अधिपत्याखालील खुद्द तसेच क्षेत्रिय कार्यालयातील वाहन निर्लेखित करण्यासंदर्भात सक्षम प्राधिका-याकडून प्रमाणपत्र मिळवून त्याची अभिलेखावर नोंद घेतल्यानंतर वाहनाचे नियमानुसार निर्लेखन आदेश काढणे आवश्यक राहील. तद्नंतरच निर्लेखित वाहनांच्या एकूण संख्येच्या ७५ टक्के मर्यादेपर्यंत नवीन वाहने खरेदी करण्यास परवानगी राहील. सदर खरेदीस प्रशासकीय विभागाची मान्यता आवश्यक राहील.**

३. निर्लेखित वाहनांच्या ७५ टक्के च्या मर्यादेत नवीन वाहने खरेदी करण्यापूर्वी वाहन खरेदीकरीता अर्थसंकल्पात पुरेशी तरतूद उपलब्ध असणे आवश्यक आहे.

४. वाहन अनुज्ञेय असणाऱ्या एका अधिकाऱ्याच्या वापरात फक्त एकच वाहन असावे.

५. वाहन निर्लेखित झाल्यानंतर त्या वाहनाचा पुन्हा वापर करता येणार नाही.

६. वाहन चालकाचे पद मंजूर/उपलब्ध असणे आवश्यक आहे.कोणत्याही परिस्थितीत वाहन चालकांची नवीन पदे निर्माण करण्यात येऊ नयेत.

७. शासकीय अधिकाऱ्यांच्या पदांच्या कर्तव्याच्या अनुषंगाने वाहने अनुज्ञेय करण्यात येते. वाहन अनुज्ञेय असणा-या अधिकाऱ्यांच्या वापरातील ज्या प्रकारचे वाहन (जीप/कार) निर्लेखित करण्यात आले असेल, त्या वाहनाऐवजी संबंधित पदासाठी त्याच प्रकारचे वाहन (दि.८ मे,२०१४ व दि.४ ऑगस्ट,२०१४ च्या शासन निर्णयान्वये व दि.७ ऑगस्ट २०१४ च्या शुध्दीपत्रकान्वये अनुज्ञेय असलेल्या व यापुढे वेळोवळी सुधारणा करण्यात येणाऱ्या शासन निर्णयातील अनुज्ञेय किंमत मर्यादेतील) खरेदी करता येईल. निर्लेखनाचे आदेश निर्गमित केल्यानंतरच वाहन खरेदीस मंजूरी देण्यात यावी.

८. वित्त विभागाच्या दि.१०.९.२००१ च्या शासन निर्णयान्वये कोणत्याही कारणास्तव रिक्त झालेली वाहन चालकांची पदे भरण्याबाबत असलेले निर्बंध दि.१०.०१.२०११ च्या शासन निर्णयान्वये शिथिल करण्यात आले आहेत. त्यानुसार रिक्त झालेले/होणारे वाहन चालकाचे पद भरण्यापूर्वी अतिरिक्त संवर्ग कक्षाकडे मागणी करणे आवश्यक राहील. अतिरिक्त संवर्ग कक्षाकडून वाहन चालक प्राप्त न झाल्यास, पदांच्या आकृतीबंधानुसार वाहन चालकांच्या मंजूर पदांच्या मर्यादेत रिक्त झालेले वाहन चालकाचे पद भरण्यास प्रत्यवाय राहणार नाही. मात्र, पद भरतीच्या संदर्भातील वेळोवेळी वित्त विभाग(वित्तीय सुधारणा) तसेच सामान्य प्रशासन विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील तरतूदींचे अनुपालन करणे आवश्यक राहील.

२. हे आदेश शासन निर्णयाच्या दिनांकापासून अंमलात येतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२२१०५९०४६५०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NARAYAN BHASKAR RINGANE

Digitally signed by NARAYAN BHASKAR RINGANE
DN: CN = NARAYAN BHASKAR RINGANE, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Finance Department
Date: 2014.08.22 17:11:53 +05'30'

**(ना.भा.रिंगणे)**

उपसचिव, महाराष्ट्र शासनप्रत,

**प्रत,**

१. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र,मुंबई ४०० ०२०,
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०,
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर,
४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर,
५. राज्यपालांचे सचिव,
६. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
७. उप मुख्य मंत्र्यांचे प्रधान सचिव,
८. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
९. सर्व विधानमंडळ सदस्य,
१०.मंत्रालयातील सर्व प्रशासनिक विभागांचे अतिरिक्त मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
११.मंत्रालयातील सर्व प्रशासनिक विभाग,
१२.अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे(पूर्व), मुंबई ४०० ०५१,
१३.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ,
१४.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१५.संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
१६.मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकणभवन, नवी मुंबई,
१७.प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
१८. प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा), मुंबई,
१९.प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, कुटीर क्र.३ व ४, अधिदान व लेखा कार्यालय आवार, मुंबई,
२०.प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
२१.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
२२.प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मादाम कामा रोड, मुंबई,
२३.प्रमुख न्यायाधिश, कुटुंब न्यायालय, पुणे/नागपूर/औरंगाबाद/अकोला/अमरावती/ठाणे/नाशिक/ सोलापूर / मुंबई, वांद्रे, मुंबई - ४००० ०५१,

२४.विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,

२५.उप संचालक, लेखा व कोषागारे, कोकण विभाग,कोकण भवन,नवी मुंबई/नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती,

२६.उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा,कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई/ पुणे/ नागपूर/ औरंगाबाद / नाशिक/ अमरावती,

२७.सर्व उप कोषागार अधिकारी,

२८. मंत्रालयाच्या सर्व प्रशासनिक विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख आणि कार्यालय प्रमुख,

२९.सर्व विभागीय आयुक्त

३०.सर्व जिल्हाधिकारी,

३१.महाराष्ट्र राज्य महिला आयोग, गृहनिर्माण भवन, वांद्रे(पूर्व), मुंबई-४०० ०५१,

३२.कुलसचिव, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक,

३३.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,

३४.सर्व जिल्हा परिषदांचे अर्थ विभागातील मुख्य लेखा व वित्त अधिकारी,

३५.संचालक (माहिती), महाराष्ट्र परिचय केंद्र, अ-८, स्टेट एम्पोरिया इमारत, बाबा खरकसिंग मार्ग, नवी दिल्ली ११०००१,

३६.बहूजन समाज पार्टी, डी-१, इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई-४०० ००१,

३७.भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ. बॅरॅक नं.१, योगक्षेम समोर,वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईंट, मुंबई-४०० ० २०,

३८. भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभुवन, एस.व्ही,पटेल रोड, मुंबई-४०० ००४,

३९.भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई,

*४०.*इंडियन नॅशनल कॉग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेय (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-४०० ००२,

४१.नॅशनलस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईंट, मुंबई-४०० ०२१,

४२.शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-४०० ०२८,

४३.महाराष्ट्र नवनिर्माण सेना, राजगड, दादर, मुंबई § ४०० ०२८,

४४.वित्त विभागातील सर्व कार्यासने,

४५.निवड नस्ती, विनियम, वित्त विभाग.

**पत्राव्दारे.